**मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत पुनरुज्जिवित करावयाच्या प्रादेशिक पाणीपुरवठा योजनांमध्ये नवीन योजनांचा समावेश करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मुपेयो-२०१८/प्र.क्र.१८३/पापु-१९**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, ७ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक: १० जानेवारी, २०१९

वाचा

१) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११५/प्र.क्र.९२/पापु-०७, दिनांक ०७ मे, २०१६
२) शासन निर्णय क्रमांक: ग्रापापु-२११५/प्र.क्र.३९/पापु-१९, दिनांक २३ सप्टेंबर, २०१६
३) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो-२०१७/प्र.क्र.८३/पापु-१९, दिनांक २५ जानेवारी, २०१७

**प्रस्तावना:-**

राज्यातील ग्रामीण पाणीपुरवठा क्षेत्रात सुधारणा करण्याच्या उद्देशाने व ग्रामीण जनतेस स्वच्छ आणि पुरेसे पिण्याचे पाणी उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने संदर्भाधीन क्र.१ येथील दि.०७ मे, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रम राबविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. सदर कार्यक्रमांतर्गत ८३ बंद असलेल्या प्रादेशिक पाणीपुरवठा योजना पुनरुज्जिवित करण्याचे प्रस्तावित आहे. सदर कार्यक्रमांतर्गत समाविष्ट एखादी योजना काही कारणास्तव रद्द झाल्यास अन्य योजना घेण्याचे अधिकार मा. मंत्री (पाणीपुरवठा व स्वच्छता) यांचे अध्यक्षतेखालील समितीस आहेत. त्यानुसार मा. मंत्री (पाणीपुरवठा व स्वच्छता) यांचे अध्यक्षतेखालील समितीच्या दि.१८ डिसेंबर, २०१८ रोजीच्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत पुनरुज्जिवित करावयाच्या प्रादेशिक योजनांमध्ये ०५ नवीन योजनांचा समाविष्ट करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, मा. मंत्री (पाणीपुरवठा व स्वच्छता) यांचे अध्यक्षतेखालील समितीच्या दि.१८ डिसेंबर, २०१८ रोजीच्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत पुनरुज्जिवित करावयाच्या प्रादेशिक पाणीपुरवठा योजनांमध्ये खालील ०५ योजनांचा नव्याने समावेश करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पुनरुज्जिवित करावयाच्या प्रादेशिक पाणीपुरवठा योजनेचे नाव | तालुका | जिल्हा | अंदाजित किंमत (रु. लक्ष) |
|---|---|---|---|---|
| १ | मौ. उंडाळे व १७ गांवे | कराड | सातारा | ४४३.७० |
| २ | मौ. आलेगांव नवेगाव-१४ गांवे | पातूर | अकोला | ६२९.१२ |
| ३ | मौ. देऊळगांव पास्टुल-१६ गांवे | पातूर | अकोला | ८२९.२० |
| ४ | मौ. बडुर व ५ गांवे | बिलोली | नांदेड | १९२.०० |
| ५ | मौ. किल्लारी-३० गांवे | औसा | लातूर | २८७१.०७ |

२. सदर योजनांच्या मंजूरीची व अंमलबजावणीची कार्यवाही मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनानुसार करण्यात यावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१०९१८१३१०९८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ram Apparao Sabane

Digitally signed by Ram Apparao Sabane
DN: CN = Ram Apparao Sabane, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2019.01.10 14:39:12 +05'30'

**(रा. अ. साबणे)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्य मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. अप्पर मुख्य सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय
६. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
७. विभागीय आयुक्त (पुणे/औरंगाबाद/अमरावती)
८. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सातारा/अकोला/नांदेड/लातूर)
१०. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था, बेलापूर, नवी मुंबई.
११. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)

१२. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)

१३. मुख्य अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.

१४. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणीपुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सातारा/अकोला/ नांदेड/लातूर)

१५. निवडनस्ती (कार्यासन पापु-१९)